**एकरेषिय (Linear) प्रकल्पांबाबत झाडे तोडण्यास तसेच काम सुरु करण्यासाठी परवानगी देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
**शासन परिपत्रक क्रमांक:एफएलडी-२०१५/प्र.क्र.७७/फ-१०**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: ०१/०३/२०१७

**वाचा -**

१) पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ.नंबर-११-३०६/२०१४/एफसी, दिनांक ०७/०५/२०१५
२) पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ.नंबर-११-३०६/२०१४/एफसी, दिनांक १५/०१/२०१५
३) पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ.नंबर-११-३०६/२०१४/एफसी, दिनांक ०८/०८/२०१४
४) शासन परिपत्रक क्रमांक:एफएलडी-२०१५/प्र.क्र.७७/फ-१०, दिनांक ०१/०७/२०१५

**शासन परिपत्रक :-**

केंद्र शासनाच्या दिनांक ०७/०५/२०१५ च्या पत्रान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन शासनाने संदर्भाधीन क्र.४ येथील परिपत्रकान्वये, एकरेषिय प्रकल्पांच्या (Linear projects) संदर्भात केंद्र शासनाच्या तत्वत: मान्यता आदेशातील आवश्यक अटींची पूर्तता झाल्यानंतर प्रकल्प यंत्रणेस झाडे तोडण्यास व काम सुरु करण्यास परवानगी देण्याकरिता संबंधीत मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) यांना प्राधिकृत करण्यात आले आहे. त्यास अनुसरुन संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रा.) हे त्यांचे वनवृत्ताचे अंतर्गत वनक्षेत्राकरिता अशी परवानगी देत आहेत. तथापि, वन्यजीव विभागाच्या अखत्यारित क्षेत्राकरिता सदरचे अधिकार वन्यजीव विभागाशी संबंधित सक्षम प्राधिकारी यांचेकडे देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

आता याद्वारे, ज्या एकरेषिय (Linear) प्रकल्पांकरिता वन्यजीव विभागाच्या अखत्यारितील वनजमिन वळती करण्यात येत असेल, अशा प्रकरणी केंद्र शासनाच्या दिनांक ०७/०५/२०१५ च्या पत्रातील व शासनाच्या दि.०१/०७/२०१५ रोजीच्या परिपत्रकामधील अटींच्या अधीन राहून प्रकल्प यंत्रणेस झाडे तोडण्यास व काम सुरु करण्यास परवानगी देण्याकरिता संबंधित वन्यजीव विभागाच्या अखत्यारितील अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०११७४९३५०११९ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2017.03.01 17:53:08 +05'30'

**(वीरेन्द्र तिवारी)**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

सोबत : शासन परिपत्रक दि.०१/०७/२०१५

**प्रत :-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव पूर्व), नागपूर
९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव पश्चिम), बोरीवली, मुंबई
१०.मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व
११.मुख्य वनसंरक्षक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली, मुंबई
१२.मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सहयादी व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर
१३.मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर
१४.मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर
१५.मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगांव-नागझीरा व्याघ्र प्रकल्प, गोंदीया
१६.मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पुणे
१७.वनसंरक्षक (वन्यजीव), नाशिक
१८. उप संचालक बफर, ताडोंबा अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर
१९. उप संचालक कोअर, ताडोंबा अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर
२०.उप वनसंरक्षक (वन्यजीव) (सर्व)
२१.उप वनसंरक्षक (प्रादेशिक) (सर्व)
२२.उप विभागीय वन अधिकारी (वन्यजीव), आलापल्ली
२३.निवडनस्ती (फ-१०)

**एकरेषिय (Linear) प्रकल्पांबाबत झाडे तोडण्यास तसेच काम सुरु करण्यासाठी परवानगी देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग

शासन परिपत्रक क्रमांक:एफएलडी-२०१५/प्र.क्र.७७/फ-१०
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: ०१/०७/२०१५

**वाचा -**

१) पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ.नंबर-११-३०६/२०१४/एफसी, दिनांक ०७/०५/२०१५
२) पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ.नंबर-११-३०६/२०१४/एफसी, दिनांक १५/०१/२०१५
३) पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ.नंबर-११-३०६/२०१४/एफसी, दिनांक ०८/०८/२०१४

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने दिनांक ०७/०५/२०१५ च्या पत्रान्वये वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत नवीन रस्ते, अस्तित्वात असलेले महामार्गांचे रुंदीकरण, ट्रान्समिशन लाईन, पाण्याची पाईप लाईन, ऑप्टीकल फायबर केबल लाईन, रेल्वे लाईन इत्यादी एकरेषिय (Linear) प्रकल्पांना तत्वत: मान्यता दिल्यानंतर प्रकल्पाचे काम जलद गतीने सुरु करुन सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने सदर तत्वत: मान्यता दिलेल्या पत्रातील आवश्यक अटींची पूर्तता प्रकल्प यंत्रणेने केल्यानंतर प्रकल्पांतर्गत वनजमिनीवरील झाडे तोडण्यास तसेच काम सुरु करण्यास परवानगी देण्याबाबत मार्गदर्शक सूचना दिलेल्या आहेत.

केंद्र शासनाच्या दिनांक ०७/०५/२०१५ च्या पत्रान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन, तसेच एकरेषिय (Linear) प्रकल्प जलदगतीने पूर्ण होण्यासाठी व अंमलबजावणी योग्य प्रकारे तसेच त्वरेने होण्याकरीता वन विभागाचे आवश्यक ते सहकार्य प्रकल्प यंत्रणेस मिळावे या अनुषंगाने शासन खालील मार्गदर्शक सूचना या परिपत्रकाव्दारे देत आहे.

**<u>शासन परिपत्रक:-</u>**

केंद्र शासनाच्या दि.०७/०५/२०१५ च्या पत्रान्वये प्राप्त मार्गदर्शक सूचनेनूसार तसेच केंद्र शासन पत्र दिनांक ०८/०८/२०१४ व दिनांक १५/०१/२०१५ च्या पत्रान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन व मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरणातील मूळ अर्ज क्र.५२/२०१५ श्री.मिलींद पारिवकाम व इतर विरुध्द केंद्र शासन या प्रकरणी दिनांक १३/०३/२०१५ रोजी दिलेले आदेश विचारात घेऊन केंद्रीय यंत्रणेचे नवीन रस्ते, अस्तित्वात असलेले महामार्गाचे रुंदीकरण, ट्रान्समिशन लाईन, पाण्याची पाईप लाईन, ऑप्टीकल फायबर केबल, रेल्वे लाईन्स इत्यादी एकरेषिय प्रकल्पांना (Linear projects) केंद्र शासनाने तत्वत: मान्यता दिल्यानंतर सदर तत्वत: मान्यतेच्या पत्रातील पर्यायी वनीकरणाची रक्कम, नक्त वर्तमान मूल्य रक्कम (NPV), वन्यजीव संवर्धन आराखडा, औषधी वनस्पतीचे रोपवन इत्यादी कामाबाबत आवश्यक पूर्ण देय रक्कम (compensatory levies) भरणा प्रकल्प यंत्रणेने केल्यानंतर प्रकल्प यंत्रणेस झाडे तोडण्यास व काम सुरु करण्यास परवानगी देण्याकरिता केंद्र शासनाच्या दिनांक ०७/०५/२०१५ च्या पत्रातील अटी व खालील अटींच्या अधीन राहून संबंधीत मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) यांना याव्दारे प्राधिकृत करण्यात येत आहे.

१) इतर प्रकल्प यंत्रणेचे नवीन रस्ते, अस्तित्वात असलेले महामार्गाचे रुंदीकरण, ट्रान्समिशन लाईन, पाणी पुरवठा लाईन्स, ऑप्टीकल फायबर केबल, रेल्वे लाईन्स इत्यादी एकरेषिय (Linear) प्रकल्पांना केंद्र शासनाने वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत तत्वत: मान्यता दिल्यानंतर सदर प्रकल्पांचे काम जलद गतीने सुरु होऊन सुविधा मिळण्यासाठी प्रकल्प यंत्रणेने तत्वत: मान्यता पत्रातील पर्यायी वनीकरणाची रक्कम, NPV ची रक्कम, वन्यजीव संवर्धन आराखडा, औषधी वनस्पती लागवड इत्यादी आवश्यक अटींची पूर्तता प्रकल्प यंत्रणेने केल्यानंतर आणि आवश्यक त्या ठिकाणी पर्यायी वनीकरणासाठीची वनेत्तर जमीन वन विभागाकडे हस्तांतरण (transfer) व वन विभागाचे नावाने (mutation) झाल्यानंतर केंद्र शासनाच्या दिनांक ०७/०५/२०१५ च्या पत्रातील अटींच्या अधीन राहून झाडे तोडण्यास व काम सुरु करण्यास (permission for tree cutting and commencement of work) परवानगी देण्यात यावी.

२) मा.राष्ट्रीय हरीत न्यायाधिकरण (वेस्ट झोन) खंडपिठ, पुणे यांनी अर्ज क्र.१३५/२०१३ मध्ये दिनांक १३/१/२०१४ अन्वये दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने संरक्षित क्षेत्राचे (Protected

areas) हद्दी पासून १० कि.मी किंवा Eco-Sensitive Zone क्षेत्राचे आत परवानगी घ्यावयाची असल्यास, प्रकल्प यंत्रणेनी प्रथम मा.राष्ट्रीय हरीत न्यायाधिकरण यांची पूर्व परवानगी प्राप्त करुन घ्यावी. मा.राष्ट्रीय हरीत न्यायाधिकरणाची परवानगी प्राप्त झाल्यानंतर प्रकल्प यंत्रणेस एकरेषिय (Linear) प्रस्तावित प्रकल्पांतर्गत वनजमिनीवरील झाडे तोडण्यास तसेच काम सुरु करण्यास परवानगी देण्यात यावी.

३) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी जनहित याचिका ८७/२००६ मध्ये दिनांक २७/१/२०१० अन्वये कांदळवनाचे तोड व ऱ्हास थांबवून व संवर्धनाच्या दृष्टीने मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने कांदळवन क्षेत्राचे संबंधात मा.उच्च न्यायालय, यांची पूर्व परवानगी प्राप्त झाल्यानंतर प्रकल्प यंत्रणेस एकरेषिय (Linear) प्रस्तावित प्रकल्पांतर्गत वनजमिनीवरील झाडे तोडण्यास तसेच काम सुरु करण्यास परवानगी देण्यात यावी.

४) आवश्यकतेनुसार राष्ट्रीय वन्यजीव मंडळाची मान्यता, CRZ मान्यता, पर्यावरणीय मान्यता (Environmental Clearance) व इतर आवश्यक वैधानिक मान्यता प्राप्त झाले नंतरच संबंधीत मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) यांनी प्रकल्प यंत्रणेस एकरेषीय (Linear) प्रस्तावीत प्रकल्पांतर्गत वनजमीनी वरील झाडे तोडण्यास तसेच काम सुरु करण्यास परवानगी देणेत यावी.

५) वन (संवर्धन) अधिनियमातील कलम २ A व मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरण अधिनियम, २०१०, मधील कलम १६ (e) नुसार सदर आदेश हे वन (संवर्धन) अधिनियम, १९८० च्या कलम २ अन्वये काढलेले आदेश समजले जातील.

६) सदर आदेशाविरुध्द वन (संवर्धन) अधिनियम, १९८० च्या कलम २ (A) व राष्ट्रीय हरित न्यायाधिकरण अधिनियम कलम १६ (e) नुसार अपिल दाखल करता येवू शकेल.

७) सदर आदेशाविरुध्द अपिल दाखल करताना, तक्रारदारास/अपिलकर्त्यास केंद्र शासनाच्या ज्या आदेशाच्या आधारे झाडे तोडण्यास व काम सुरु करण्यास परवानगी देण्यात आली त्या मूळ आदेशाविरुध्द देखील दाद मागता येईल.

८) मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरणाने दिनांक ७/११/२०१२ रोजी दिलेल्या निर्देशाप्रमाणे तत्वत: मान्यता (in-principle approval) आदेश व एकरेषिय (Linear) प्रकल्पांना झाडे तोडण्यास व काम सुरु करण्यास (tree cutting and commencement of work) परवानगी देण्याबाबतचे

मराठी व इंग्रजी भाषेतील आदेश जनतेच्या माहितीसाठी वन विभागाच्या वेबसाईटवर तसेच ते वर्तमानपत्रात प्रसिध्द करण्याची दक्षता क्रमश: वन विभाग व प्रकल्प यंत्रणेनी घ्यावी. तसेच इतर आदेशांचे पालन करावे.

९) अशा प्रकरणात केंद्र शासनाने तत्वत: मान्यता दिलेल्या पत्रातील सर्व अटींची पूर्तता करुन, तत्वत: मान्यता प्राप्त झाल्यापासून ६ महीन्याचे आत अंतिम मान्यता प्राप्त होईल, याबाबत संबंधित क्षेत्रिय अधिकारी / प्रकल्प यंत्रणा यांनी दक्षता घ्यावी.

१०) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी याबाबतचा एकत्रित त्रैमासिक अहवाल राज्य शासनास / केंद्र शासनास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०११३०६०११३१९ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(वीरेन्द्र तिवारी)**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत :-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
६. अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व
८. उप वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व
९. निवडनस्ती (फ-१०)

**F. No. 11-306/ 2014-FC**
Government of India
Ministry of Environment, Forests and Climate Change
(Forest Conservation Division)

Indira Paryavaran Bhawan
Aliganj, Jorbagh Road
New Delhi - 110 001
Dated: 7th May, 2015

To

**The Principal Secretary (Forests)**
All State / Union Territory Governments

*Sub:* Guidelines for diversion of forest land for non-forest purpose under the Forest (Conservation) Act, 1980- Simplified procedure for grant of permission for felling of trees standing on forest land to be diverted for execution of linear projects: *reg.*

Sir,

I am directed to refer to guidelines on the afore-mentioned subject issued by this Ministry vide letters of even number dated 8th August 2014 and 15th January 2015 on the above-mentioned subject wherein this Ministry communicated a simplified procedure for grant of permission for tree cutting and commencement of work of linear project in forest land, and to say that the said guidelines were examined by the Hon'ble National Green Tribunal (NGT) in the Original Application No. 52 of 2015 in the matter of Milind Pariwakam & Anr. versus Union of India.

2. The Hon'ble NGT in their order dated 13th March 2015 disposed of the said O.A. by issuing certain directions.

3. In compliance of directions issued by the Hon'ble NGT in the said O.A. and in supersession of this Ministry's said letters/guidelines of even number dated 8th August 2014 and 15th January 2015, I am directed to say as below:

(i) With a view to facilitate speedy execution of projects involving linear diversion of forest land such as laying of new roads, widening of existing highways, transmission lines, water supply lines, optic fiber cabling, railway lines *etc.*, in-principle approval under the Forest (Conservation) Act, 1980 (FC Act) issued by the Central Government may be deemed as the working permission for tree cutting and commencement of work, if the required funds for compensatory afforestation, net present value (NPV), wildlife conservation plan, plantation of dwarf species of medicinal plants, and all such other compensatory levies specified in the in-principle approval are realised from the user agency and where necessary, for compensatory afforestation, transfer and mutation of non-forest/revenue forest land in favour of State Forest Department is affected;

(ii) After the afore-mentioned compensatory levies specified in the in-principle approval are realised from the user agency and where necessary, for compensatory afforestation, transfer and mutation of non-forest/revenue forest land in favour of State Forest Department is affected, the State Government or a Senior Officer not below the Rank of a Divisional Forest Officer, having jurisdiction over the forest land

proposed to be diverted, duly authorized in this behalf by the State Government, shall pass an order for tree cutting and commencement of work of a linear project in forest land;

(iii) No non-forest activity in the forest area that is covered under Section 2 of the FC Act would be permitted and carried on in any manner whatsoever unless an order specified in para (ii) above has been passed by the competent authority of that State Government and is placed in the public domain by putting it on its website and all other requirements in accordance with law are complied with;

(iv) For the purpose of Section 2A of the FC Act and Section 16 (e) of the National Green Tribunal Act, 2010 (NGT Act) the Order for tree cutting and commencement of work of linear project in forest land, order specified in para (ii) above, shall be an order under Section 2 of the FC Act;

(v) An appeal as per provisions of section 2 (A) of FC Act and/or Section 16 (e) of the NGT Act can be filed against any such order specified in para (ii) above for tree cutting and commencement of work of linear project in forest land;

(vi) In the event of filing of such appeal, it would be open for the person aggrieved, to assail the order/clearance granted by the Central Government under Section 2 of the FC Act which forms an integral part and sole basis of the order specified in para (ii) above;

(vii) The State Government and the project proponent shall take further action as has been stipulated by the Hon'ble National Green Tribunal in their Judgment dated 7th November 2012 in Appeal No. 7/2012 to accord publicity and to ensure availability in public domain of in-principle approval under the FC Act accorded by the Central Government and the order specified in para (ii) above. State Government and the project proponent shall also ensure strict compliance of other direction(s) contained in the said judgment; and

(viii) The State Governments, in such cases shall seek and obtain from the Central Government final/formal approval under the FC Act for diversion of such forest land at the earliest, and in any case not later than five years from the date of grant of the in-principle approval.

This issues with approval of the Minister of State (Independent Charge) for Environment, Forest and Climate Change.

Yours faithfully,

(H.C. Chaudhary)
Director

Copy to:-

1. Prime Minister's Office (*Kind attn.:* Shri Santosh D. Vaidya, Director), South Block, New Delhi.

2. The Secretary (Coordination), Cabinet Secretariat, Rashtrapati Bhawan, New Delhi.
3. Secretary, Ministry of Power, Government of India, Shram Shakti Bhawan, New Delhi.
4. Secretary, Ministry of Petroleum and Natural Gas, Government of India, Shastri Bhawan, New Delhi.
5. Chairman, Railways Board, Rail Bhawan, New Delhi.
6. Secretary, Ministry of Road Transport and Highways, Government of India, Transport Bhawan, New Delhi.
7. Director General, Border Roads Organization, New Delhi.
8. Principal Chief Conservator of Forests, all States/UTs.
9. Nodal Officer, the Forest (Conservation) Act, 1980, all State/UT Governments.
10. All Regional Offices, Ministry of Environment, Forests and Climate Change (MoEFCC), Government of India (GoI).
11. Joint Secretary in-charge, Impact Assessment Division, MoEFCC, GoI.
12. All Assistant Inspector General of Forests/ Directors in the Forest Conservation Division, MoEFCC, GoI.
13. Director, Regional Offices Headquarters Division, MoEFCC, GoI.
14. Sr. Director (Technical), NIC, MoEFCC, GoI with a request to place a copy of this letter on website of this Ministry.
15. Sr. PPS to the Secretary, Ministry of Environment, Forests and Climate Change, GoI.
16. Sr. PPS to the Director General of Forests & Special Secretary, MoEFCC, GoI.
17. Sr. PPS to the Addl. Director General of Forests (Forest Conservation), MoEFCC, GoI.
18. PS to the Inspector General of Forests (Forest Conservation), MoEFCC, GoI.
19. Guard File.

**(H.C. Chaudhary)**
Director